एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत पुरक पोषण आहाराच्या आणि घरपोच आहाराच्या दरात रू १/- ने वाढ करणे बाबत ..

**महाराष्ट्र शासन**
महिला व बाल विकास विभाग,
शासन निर्णय,क्रमांक :एबावि २०१० / प्र.क्र. ११३ /का-५,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक :- २९ ऑक्टोबर, २०११

**वाचा:-** १) महिला व बाल विकास विभाग,शासन निर्णय, क्र.एबावि-२००५/प्र.क्र.२३३/का-५, दि.२८.१०.२००५

२) महिला व बाल विकास विभाग,शासन निर्णय,क्र.एबावि-२००४/प्र.क्र.०२/का-५, दि.१८.०८.२००६

३) महिला व बाल विकास विभाग,शासन निर्णय,क्र.एबावि-२००४/प्र.क्र.०२/का-५, दि. २९.६.२००७

४) भारत सरकार,केंद्रिय महिला व बाल विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र-

(I) क्रमांक.४-२/२००८-सीडी-II, दिनांक ७.११.२००८.

(II) क्रमांक.४-२/२००८-सीडी-II, दिनांक ११.११.२००८.

(III) क्रमांक ५-९/२००५/ND/Tech (Vol.II), दिनांक २४.२.२००९

५) शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्र. एबावि-२००८/प्र.क्र.५९/का-५, दि.२४ ऑगस्ट, २००९

६) शासन निर्णय,क्रमांक :एबावि २०१० / प्र.क्र. ११३ /का-५, दिनांक २६ सप्टेंबर, २०११

७) आयुक्त , महिला व बाल विकास यांचे पत्र क्रमांक मबावि/एबाविसेयो/का-२/३४९१/२०११, दि.१९.१०.२०११

## शासन निर्णय

एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत पुरक पोषण आहाराच्या आणि घरपोच आहाराच्या दरात दिनांक १.१०.२०११ पासून रू १/- ने वाढ करण्यास शासन निर्णय दिनांक २६.९.२०११ अन्वये मंजूरी देण्यात आलेली आहे. त्याअनुषंगाने ६ महिने ते ३ वर्षे वयोगटातील मुले व गर्भवती आणि स्तनदा माता तसेच ६ महिने ते ६ वर्षे वयोगटातील तीव्र कमी वजनाच्या मुलांना पुरविण्यात येणा-या घरपोच आहाराच्या चवीमध्ये (THR) सुधारणा करण्याचे अनुषंगाने पुरवठादार महिला संस्थेच्या प्रतिनिधी समवेत आयुक्त, महिला व बाल विकास यांनी बैठक आयोजित करून घरपोच आहारामध्ये सुधारणा करण्याबाबत फुड ॲण्ड न्युट्रीशियन बोर्ड , मुंबई यांचा सल्ला घेवून सदर दरवाढ दिनांक १.११.२०११ पासून लागू करण्यात यावी, असा प्रस्ताव दिनांक १९.१०.२०११ च्या पत्रान्वये सादर केला आहे. त्याअनुषंगाने घरपोच आहाराच्या चवीमध्ये खालील सुधारणा करण्याचे महिला संस्थांनी मान्य केले आहे.

१) THR आहाराच्या सुखडी व शिऱ्यामध्ये वेलची व खोबरे पावडर चव वाढविण्यासाठी टाकणे.
२) उपमा मध्ये चव वाढविण्यासाठी साखर टाकणे.
३) उपम्याची चव वाढविण्यासाठी डीहायड्रेड व्हेजीटेबल टाकणे.
४) THR आहाराच्या पाककृतीच्या वेष्टन हे अधिक आकर्षक दिसण्यासाठी विविध रंगामध्ये देणे.
५) सुक्ष्म पोषक तत्वांची लाभदायकता वाढविण्यासाठी फुडग्रेड ऐवजी फार्माग्रेड मध्ये देणे.
६) शिऱ्याची सर्व्हींग साईज प्रति लाभार्थी प्रति दिन ३ ग्रॅमने वाढविणे म्हणजे ११७ ग्रॅम ऐवजी १२० ग्रॅम करणे. (६ महिने ते ३ वर्षे वयोगटातील मुलांसाठी )

७) उपम्याच्या सर्व्हींग साईजमध्ये प्रति लाभार्थी प्रति दिन १० ग्रॅम वाढविणे. (६ महिने ते ३ वर्षे वयोगटातील मुले व गर्भवती व स्तनदा माता यांचे साठी )

८) सुखडी सर्व्हींग साईजमध्ये प्रति लाभार्थी प्रति दिन १० ग्रॅम वाढविणे.

९) १३०० किलोग्रॅम धान्य मावेल अशी फुडग्रेडची प्लास्टीक बरणी प्रत्येक लाभार्थ्यास वर्षातून एकदा पुरवठादार संस्थेद्वारे विनामुल्य अंगणवाडी पर्यत पुरवठा करणे.

१०) THR आहाराच्या पाककृती कशा पध्दतीने तयार कराव्यात व सेवन करण्याची पध्दती इ. बाबत तालुकास्तरावर मुख्यसेविका / पर्यवेक्षिका, मदतनीस व सेविका हयांना प्रशिक्षण देणे.

११) THR आहाराबाबतच्या पाककृती संबधीच्या ३ मार्गदर्शिका वर्षातून एकदा प्रत्येक अंगणवाडीस पुरवठादार संस्थेद्वारे विनामुल्य पुरवठा करणे.

एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत ६ महिने ते ३ वर्ष वयोगटातील मुले व गर्भवती व स्तनदा माता तसेच ६ महिने ते ६ वर्षे वयोगटातील तीव्र कमी वजनाची मुले यांना पुरविण्यात येणा-या घरपोच आहारामध्ये (THR) वरील प्रमाणे सुधारणा करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत असून वरील प्रमाणे सुधारणा करण्याच्या अटीवर शासन निर्णय दिनांक २६.९.२०११ च्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेली प्रति दिन प्रति लाभार्थी रू १/- ही दरवाढ पुरवठादार महिला संस्थांना दिनांक १.१०.२०११ ऐवजी दिनांक १.११.२०११ पासून अनुज्ञेय राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सांकेतांक क्र. 201110311007330001

(श.पा.वारे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
मा.उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
मा.मंत्री / राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, अल्पसंख्यांक विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव, (व्यय) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव ,आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव ,सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व मंत्रालयीन विभाग.
आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे
महासंचालक, राजमाता जिजाऊ माता-बाल आरोग्य व पोषण मिशन, नवी मुंबई
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
सर्व विभागीय आयुक्त
ग्रंथपाल , महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, विधान भवन, मुंबई
सर्व जिल्हाधिकारी
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
महालेखापाल, महाराष्ट्र १ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा) मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र २ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा) नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
सर्व उप मुख्य कार्यकारी अधिकारी ( बाल कल्याण), जिल्हा परिषद
सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रामीण, आदिवासी आणि नागरी प्रकल्प) (आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांचे मार्फत )
मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, पुणे
सहाय्यक संचालक, (वित्त व लेखा) , महिला व बाल विकास , पुणे
नियोजन विभाग (का-१४७२) , मंत्रालय, मुंबई
वित्त विभाग (व्यय) मंत्रालय, मुंबई
महिला व बाल विकास विभागातील सर्व उप सचिव / अवर सचिव व कार्यासने मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती (कार्यासन -५)